अंध अपंगांना निवासासाठी, वाणिज्यिक / औद्योगिक प्रयोजनासाठी विनालिलावाने जमीन देण्यासंबंधातील धोरण

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्र. जमीन १०९८/१५१५४/ प्र.क्र. ७५/९८/ ज-१
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक २६ एप्रिल २००१.

पहा : शासन परिपत्रक महसुल व वन विभाग क्र. एलएनडी १०९०/ प्र.क्र. ११५/ ज १ दिनांक २५.२.१९९१.परिच्छेद क्र. ७ मधील कलम ४२ व ४३ नुसार राज्य शासनाने अंध व अपंग व्यक्तींना शासकिय जमीन सवलतीच्या दराने देण्याची शिफारस केली आहे.

२. महाराष्ट्र जमीन महसुल अधिनियम १९६६ व त्याखालील तयार करण्यात आलेले महाराष्ट्र महसूल - सरकारी जमिनींचे वितरण नियम १९७१ मधील नियम २६ व ३१ मधील तरतुदीनुसार अनुक्रमे निवासासाठी तसेच वाणिज्यिक प्रयोजनासाठी शासकिय जमिनी लिलावाने मंजूर करण्याची तरतुद आहे. अंध व अपंग व्यक्तींना निवासासाठी तसेच वाणिज्यिक प्रयोजनासाठी विनालिलावाने जमीन देण्याची तरतुद नियमात नसल्याने उक्त नियमातील नियम २८ नुसार स्वातंत्र्य सैनिक, सशस्त्र दलातील नोकर, सुवर्णकार व सरकारी नोकर यांना ज्याप्रमाणे विनालिलावाने कब्जेहक्काने जमीन देण्याची तरतूद आहे त्याप्रमाणे अंध व अपंग व्यक्तींना विनालिलावाने जमीन देण्याचा व नियम ३१ अन्वये वाणिज्यिक प्रयोजनासाठी विनालिलावाने जमीन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने साकल्याने विचार करुन पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे -

१. महाराष्ट्र जमीन महसूल - सरकारी जमीन वितरण नियम १९७१ च्या नियम २८ नुसार स्वातंत्र्य सैनिक, सशस्त्र दलातील सैनिक, सुवर्णकार व सरकारी नोकर यांना ज्याप्रमाणे विनालिलावाने जमिनीची भोगवटयाची किंमत आकारुन जमीन देण्यात येते. त्यामध्ये अंध व अपंग व्यक्तींचाही समावेश करण्यात आला आहे. त्यानुसार नियमात सुधारणा करण्यात येत आहे.

२. जर अंध व अपंग व्यक्ती हे रसवंती केंद्र / टेलिफोन बुथ / झेरॉक्स सेंटर इ. तासक जोडधंदे करणार असतील तर त्यांना २०० चौ.फु. जमीन महाराष्ट्र जमीन महसूल - सरकारी जमिनींचे वितरण नियम १९७१ च्या नियम ३१ मधील तरतुदीनुसार एक खास बाब म्हणून विनालिलावाने प्रचलित बाजार भावाने येणारे भोगाधिकार मुल्य आकारुन कब्जेहक्काने मंजूर करण्यात यावी, त्यानुसार नियमात सुधारणा करण्यात येत आहे.

3. अंध व अपंग व्यक्तींना विशिष्ट औद्योगिक प्रयोजनासाठी किमान किती क्षेत्र आवश्यक आहे याबाबत महाराष्ट्र औद्योगिक विकास मंडळ / महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ अथवा शासन स्तरावरील उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अभिप्रायास अधीन राहून प्रत्येक प्रकरणाच्या गुणवत्तेनुसार आवश्यक तितके क्षेत्र महाराष्ट्र जमीन महसुल सरकारी जमीनींचे वितरण नियम १९७१ च्या नियम ३१ मधील तरतुदीनुसार विना लिलावाने प्रचलित बाजारभावाने येणारे भोगाधिकार मुल्य आकारुन कब्जेहक्काने मंजूर करण्यात यावे.

GR-2002092511240600-1500

४. महाराष्ट्र जमीन महसुल सरकारी जमीनींचे वितरण नियम १९७१ च्या नियम ३१ मधील तरतुदीनुसार अंध व अपंग व्यक्तींना निवासी / वाणिज्यिक / औद्योगिक प्रयोजनासाठी जमीन मंजूर करणे संदर्भात जिल्हाधिकारी / विभागीय आयुक्त यांचे वित्तीय अधिकारात कोणताही बदल करण्यात येवू नये.

५. महाराष्ट्र अपंग व्यक्ती - पुनर्वसन व कल्याण अधिनियम १९९३ मधील कलम २ अन्वये अपंग व्यक्तींनी महाराष्ट्र अपंग व पुनर्वसन कल्याण महामंडळाचा दाखला प्राप्त करुन घेतल्यानंतर अशा अपंग व्यक्तींना, निवासी, वाणिज्यिक प्रयोजनासाठी जमीन देण्यास पात्र समजण्यात यावे.

६. अपंग व्यक्ती याची व्याख्या ही अपंग व्यक्ती - समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि संपूर्ण सहभाग अधिनियम १९९५ या प्रमाणेच असेल.

हा शासन निर्णय समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभागाच्या सहमतीने विधी व न्याय विभागाच्या सल्ल्याने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३७४/२००१/ व्यय १ दिनांक २१.३.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

रमाकांत असमर<br>
सह सचिव, महाराष्ट्र शासन<br>
महसुल व वन विभाग